स्वच्छ भारत अभियान (नागरी) अंतर्गत नागरी घनकचरा व्यवस्थापन प्रकल्पास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.
भद्रावती नगरपरिषद, जिल्हा चंद्रपूर.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:-स्वमअ-२०२०/प्र.क्र.१७(८)/नवि-३४**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ३० जानेवारी, २०२०

वाचा:-

१. शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांक: स्वभाअ-२०१५/प्र. क्र. २३/नवि-३४, दि. १५.०५.२०१५
२. स्वच्छ भारत अभियान (नागरी) अंतर्गत गठीत उच्चाधिकार समितीच्या दिनांक ३०/०८/२०१९ रोजी संपन्न झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.
३. शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांक:- स्वमअ-२०१८/प्र.क्र. १४६/नवि-३४, दि.१२.०४.२०१८

**शासन निर्णय :-**

स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) अंतर्गत भद्रावती नगर परिषदेच्या नागरी घनकचरा व्यवस्थापनाच्या रु. २.३८७० कोटी रुपयांच्या सविस्तर प्रकल्प अहवालास संदर्भीय क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

२. सदर सविस्तर प्रकल्प अहवालाची अंमलबजावणी भद्रावती नगरपरिषदे मार्फत सुरु असताना त्यांच्या असे लक्षात आले की, शहरातील घनकचरा व्यवस्थापनाच्या दृष्टिने या सविस्तर प्रकल्प अहवालात काही बाबींचा समावेश नाही. त्यामुळे, त्या बाबींचा समावेश सविस्तर प्रकल्प अहवालात करण्याबाबतचा प्रस्ताव भद्रावती नगरपरिषदेने सादर केला होता.

३. भद्रावती नगरपरिषदेने सादर केलेल्या प्रस्तावाची तपासणी राज्य अभियान संचालनालयाच्या स्तरावर करून तो प्रस्ताव दिनांक ३०.०८.२०१९ रोजी झालेल्या उच्चाधिकार समितीच्या मान्यतेसाठी सादर केला होता. उच्चाधिकार समितीने त्याच बैठकीत सदर प्रस्तावास मान्यता दिली आहे.

४. भद्रावती नगरपरिषदेने सादर कलेल्या प्रस्तावास उच्चाधिकार समितीने दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने या शासन निर्णया सोबतच्या विवरणपत्रातील रकाना ४ मध्ये दर्शविलेल्या व रकाना ५ मधील रू ६०,००,०००/- ( साठ लक्ष फक्त) किंमतीच्या बाबी मंजूर करण्यास शासन मान्यता देत आहे.

५. सदर वाढीव खर्च रक्कम भद्रावती नगरपरिषदेने १४ व्या वित्त आयोगाच्या निधीमधून अथवा स्वनिधी मधून करवा. यासाठी शासन कोणताही वाढीव निधी संबंधित नगरपरिषदेस शासन उपलब्ध करून देणार नाही.

६. संदर्भीय क्रमांक ३ येथील दिनांक १२.०४.२०१८ च्या शासन निर्णयात नमूद अटी व शर्तींचे पालन करणे बंधनकारक राहील.

७. सदरच्या बदलामुळे भद्रावती नगरपरिषदेच्या सविस्तर प्रकल्प अहवालाची सुधारित किंमत रू २,९८,७०,०००/- (रूपये दोन कोटी अठ्ठयाण्णव लक्ष सत्तर हजार फक्त) एवढी राहील.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००१३०१७३२५४९४२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Ajit Sahebrao Palwe

Digitally signed by Ajit Sahebrao Palwe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bcc5dbdaa52955626b8257f1105a8a62ddbd1337948a428b4e4c992e5d3bf423, cn=Ajit Sahebrao Palwe
Date: 2020.02.05 12:44:34 +05'30'

**(अजित पालवे)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव
२. मा. मंत्री, नगर विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. राज्यमंत्री नगरविकास विभाग यांचे खाजगी सचिव
४. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक
५. अप्पर मुख्य सचिव,नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक
६. प्रधान सचिव, नगर विकास विभाग (२) यांचे स्वीय सहायक
७. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
८. आयुक्त तथा संचालक, महानगरपालिका प्रशासन संचालनालय, मुंबई.
९. राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान संचालनालय, मुंबई.
१०. विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर.
११. जिल्हाधिकारी, चंद्रपूर.
१२. जिल्हा प्रशासन अधिकारी, चंद्रपूर.
१३. मुख्याधिकारी, भद्रावती नगर परिषद.
१४. निवडनस्ती, नवि-३४.

## विवरणपत्र

(शासन निर्णय क्रमांक:-स्वमअ-२०२०/प्र.क्र.१७(८)/नवि-३४ दिनांक ३० जानेवारी, २०२० सोबतचे विवरणपत्र)

(किंमत रु. कोटीमध्ये)

| शहर | घनकचरा व्यवस्थापनासाठी अनुज्ञेय रक्कम | सविस्तर प्रकल्प अहवालाची मंजूर किंमत | नव्याने मंजूर बाबी | नव्याने मंजूर करण्यात आलेल्या बाबींची किंमत | सविस्तर प्रकल्प अहवालाची सुधारित किंमत |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| भद्रावती | ७.२६०० | २.३८७० | Additional १० Ghantagadi | ०.६००० | २.९८७० |